**शासकीय मुद्रण, लेखनसामग्री व प्रकाशन संचालनालय, मुंबई व संचालनालयाच्या अधिपत्याखालील विविध कार्यालयातील अस्थायी पदांना दि.०१.०३.२०२५ ते दि.३१.०८.२०२५ पर्यंत मुदतवाढ देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, ऊर्जा, कामगार व खनिकर्म विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक :- अस्थायी-२०२५/प्र.क्र.३५/उद्योग-४,**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- ०७ मार्च, २०२५.

**वाचा :-** १) शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा, कामगार व खनिकर्म विभाग, क्रमांक अस्थामु-२०१६/ प्र.क्र.२५/उद्योग-४, दि.२०.०९.२०२४.
२) संचालक, शासकीय मुद्रण, लेखनसामग्री व प्रकाशन संचालनालय, मुंबई यांचे पत्र क्रमांक आस्था/अस्थायी पदे/२०२४-२०२५/३१६६/कार्या-४अ-१, दि.१३.०२.२०२५.
३) वित्त विभाग शासन निर्णय क्र.पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.०३.०३.२०२५.

**शासन निर्णय :-**

संचालक, शासकीय मुद्रण, लेखनसामग्री व प्रकाशन संचालनालय, मुंबई या संचालनालयातील आणि संचालनालयाच्या अधिपत्याखालील शासकीय मुद्रणालये, शासकीय ग्रंथागारे आणि शासकीय लेखनसामग्री भांडारे यांच्या आस्थापनेवरील एकूण ८२० अस्थायी पदांना शासन निर्णय उद्योग, ऊर्जा, कामगार व खनिकर्म विभाग, क्रमांक अस्थामु-२०१६/ प्र.क्र.२५/उद्योग-४, दि.२०.०९.२०२४ (वाचा क्रमांक-१) अन्वये दि.२८.०२.२०२५ पर्यंतच्या कालावधीसाठी मुदतवाढ देण्यास शासन मान्यता देण्यात आलेली आहे. आता वित्त विभागाच्या संदर्भ क्र.३ च्या शासन निर्णयानुसार या शासन निर्णयासोबतच्या विवरणपत्रामधील ८२० अस्थायी पदे दि.०१.०३.२०२५ ते दि.३१.०८.२०२५ पर्यंतच्या कालावधीसाठी पुढे चालू ठेवण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर अस्थायी पदांचा तपशील खालीलप्रमाणे आहे. :-

| अ. क्र. | कार्यालयाचे नांव | दि.०१.०९.२०२४ ते दि.२८.०२.२०२५ पर्यंत मुदतवाढ दिलेली पदे | दि.०१.०३.२०२५ ते दि.३१.०८.२०२५ पर्यंत मुदतवाढ प्रस्तावित असलेली पदे |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | शासकीय मुद्रण, लेखनसामग्री व प्रकाशन संचालनालय, मुंबई. | २२ | २२ |
| २ | शासकीय लेखनसामग्री भांडार,पुणे. | ७ | ७ |
| ३ | शासकीय लेखनसामग्री भांडार, नागपूर. | ३ | ३ |
| ४ | शासकीय लेखनसामग्री भांडार, औरंगाबाद. | ५ | ५ |
| ५ | शासकीय मध्यवर्ती मुद्रणालय, मुंबई. | २३२ | २३२ |
| ६ | येरवडा कारागृह मुद्रणालय, पुणे. | २०० | २०० |
| ७ | शासकीय मुद्रणालय व ग्रंथागार, नागपूर. | ११५ | ११५ |
| ८ | शासकीय फोटोझिंको मुद्रणालय, पुणे. | ३८ | ३८ |

| अ. क्र. | कार्यालयाचे नांव | दि.०१.०९.२०२४ ते दि.२८.०२.२०२५ पर्यंत मुदतवाढ दिलेली पदे | दि.०१.०३.२०२५ ते दि.३१.०८.२०२५ पर्यंत मुदतवाढ प्रस्तावित असलेली पदे |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| ९ | शासकीय मुद्रणालय व लेखनसामग्री भांडार, कोल्हापूर. | ५७ | ५७ |
| १० | शासकीय मुद्रणालय, औरंगाबाद. | ६७ | ६७ |
| ११ | मध्यवर्ती कारागृह मुद्रणालय, नागपूर. | ३४ | ३४ |
| १२ | शासकीय मुद्रणालय, वाई. | ४० | ४० |
| | एकूण | ८२० | ८२० |

३. सदर ८२० अस्थायी पदांवर नियुक्त केलेले अधिकारी/कर्मचारी हे महागाई भत्ता व इतर भत्ते मिळण्यास पात्र आहेत.

४. यावरील खर्च सर्व संबंधित कार्यालयांनी त्यांच्याकडील संबंधित लेखाशिर्षाखाली त्या-त्या वित्तीय वर्षासाठीच्या मंजूर तरतूदीमधून भागविण्यात यावा व तो त्याच लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

५. वित्त विभाग शासन निर्णय क्रमांक असंक-१००४/प्र.क्र.१२/(भाग-२)/२००४/वित्तीय सुधारणा-१, दि. ०४ ऑक्टोबर, २००४ व वित्त विभाग शासन निर्णय क्रमांक पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.०३.०३.२०२५ मधील तरतदीनुसार प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार सदरहू शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला आहे. त्याचा संगणक संकेतांक २०२५०३०७१६५५३४४२१० असा आहे. हा शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

AMRUTA VITTHAL GUND

Digitally signed by AMRUTA VITTHAL GUND
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=INDUSTRY ENERGY LABOUR AND MINING DEPARTMENT, 2.5.4.20=2ff0c9bda372c9d98d9f5ab08ece2984a8b6f534c51868a746ca62f6130cf349, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=B10EACD44D2AA0ABC6920FE813B193EC59549DEC1DB95ECDA429145459C6C35A, cn=AMRUTA VITTHAL GUND
Date: 2025.03.07 16:57:22 +05'30'

**( अमृता गुंड )**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. प्रभारी संचालक, शासकीय मुद्रण व लेखनसामग्री व प्रकाशन संचालनालय, मुंबई. (३ प्रती)
२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरिक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
३. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई. (३ प्रती)
४. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई. (३ प्रती)
५. सर्व व्यवस्थापक, शासकीय मुद्रणालये (संचालनालयामार्फत)
६. सर्व सहायक संचालक, शासकीय लेखनसामग्री भांडारे व ग्रंथागारे (संचालनालयामार्फत)
७. जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर/पुणे/औरंगाबाद/कोल्हापूर. (प्रत्येकी ३ प्रती)
८. जिल्हा कोषागार अधिकारी, वाई, जि. सातारा. (३ प्रती)
९. कक्ष अधिकारी, वित्त विभाग (वित्तीय सुधारणा), मंत्रालय, मुंबई-३२.
१०. कक्ष अधिकारी (प्रशासन-१), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.